**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील सहायक संचालक (माहिती)/माहिती अधिकारी/ अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने, गट-ब संवर्गात सरळसेवेने नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.माजम-२०१०/११२८/प्र.क्र.५/१०/३४-अ,**
**मंत्रालय, मुंबई - ४०००३२.**
**दिनांक : २४ मार्च, २०११.**

**शासन निर्णय :**

माहिती व जनसंपर्क महासंचालनायातील सहायक संचालक (माहिती)/माहिती अधिकारी/अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने गट-ब या संवर्गात सरळसेवेने नियुक्ती करण्यासाठी स्थापन केलेल्या निवड समितीने नियुक्तीसाठी शिफारस केलेल्या व माहिती व जनसंपर्क महासंचालनालयात सध्या कार्यरत असलेल्या खाली नमूद केलेल्या उमेदवारांची रुपये ९३००-३४८०० + ग्रेड वेतन ४४०० या वेतनश्रेणीत दोन वर्षाच्या कालावधीसाठी परिवीक्षाधीन नियुक्ती करण्यात येत असून त्यांच्या नावापुढे स्तंभ ५ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र.<br>१ | उमेदवाराचे नाव<br>२ | प्रवर्ग<br>३ | गुणानुक्रम<br>४ | पदस्थापनेचे पद<br>५ |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. मंगेश बाबाराव वरकड | (इ.मा.व.) | ४ | माहिती अधिकारी,<br>जिल्हा माहिती कार्यालय, अमरावती |
| २ | श्रीमती शैला निळकंठ दांदळे | (इ.मा.व.) | ५ | सहायक संचालक,<br>विभागीय माहिती कार्यालय, नागपूर |

२. वरील उमेदवारांची चारित्र्य पडताळणी व वैद्यकीय तपासणी नियमानुसार पुन्हा घेणे आवश्यक असल्यास त्याची पूर्तता करण्यात यावी. तसेच उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याचे प्रमाणपत्र तसेच जात पडताळणी झाल्याचे वैधता प्रमाणपत्र व शैक्षणिक अर्हतेबाबतची प्रमाणपत्रे घेण्यात यावीत. या सर्व बाबीची पूर्तता संबंधितांनी आदेशाच्या दिनांकापासून दोन महिन्यात करणे आवश्यक आहे. यासाठी विलंब लागत असल्यास वेळीच शासनास अवगत करणे आवश्यक राहील. कोणत्याही परिस्थितीत या बाबींची पूर्तता विहीत कालावधीत न केल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

३. वरील उमेदवार हे माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या सहायक संचालक (माहिती)/ माहिती अधिकारी/ अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने गट-ब संवर्गातील पदावर दोन वर्षाच्या कालावधीसाठी परिवीक्षाधीन अधिकारी म्हणून कार्यरत असतील.

४. परीविक्षाधीन काळात उमेदवारांचे काम अपेक्षित दर्जाचे आढळले नाही किंवा त्यांची वर्तणूक समाधानकारक किंवा गट-ब दर्जाच्या अधिकाऱ्यास शोभेल अशी न आढळल्यास त्याला सेवेतून कमी करण्यात येईल.

५.	परीविक्षाधीन काळात उमेदवाराने शासकीय अधिकाऱ्यांसाठी विहित केलेल्या मराठी व हिंदी भाषा परिक्षा, जर ते त्या परिक्षामध्ये यापूर्वीच उत्तीर्ण झालेले नसतील तर किंवा त्यांना अशा परिक्षेत उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

६.	उमेदवारांनी आदेशाच्या दिनांकापासून **एक महिन्याच्या आत** संबंधित पदावर हजर होणे आवश्यक आाहे. विहित केलेल्या मुदतीत हजर न झाल्यास निवडसूचीवरील त्यांच्या गुणवत्ताक्रमानुसार अनुज्ञेय असलेली संवर्गातील ज्येष्ठता त्यांना मिळणार नाही. तसेच प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांच्याकडून वरील मुदतीत काहीही कळविण्यात न आल्यास निवडयादीवरील त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता काढून टाकण्यात येईल. व प्रतिक्षा सूचीवरील उमेदवारास नियुक्ती देण्यात येईल. याची कृपया नोंद घ्यावी.

७.	वर नमूद केलेल्या शर्तीव्यतिरिक्त सर्वसाधारणपणे राज्यसेवा, गट-ब च्या अधिकाऱ्यांसाठी महाराष्ट्र शासनाने विहित केलेले इतरही सेवानियम या उमेदवारास लागू असतील व त्या नियमांचे पालन करणे त्यांना बंधनकारक राहील. नियमाविषयीचे अज्ञान ही बाब कोणतीही सवलत/ सूट मिळण्यास ग्राह्य ठरणार नाही.

८.	माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या स्तरावर या संवर्गात नियुक्त झालेल्या उमेदवारांची उक्त अटी व शर्तीची पूर्तता करुन घ्यावी व तसा अहवाल शासनाला सादर करावा. विहित कालावधीत हजर न होणाऱ्या उमेदवारांची माहिती शासनास वेळीच उपलब्ध करुन द्यावी.

९.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra,gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक सांकेतांक** **२०११०३२४११५७१३००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(कुं. न. घाटगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
संचालक (माहिती) (वृत्त/जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल, मुंबई-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
महालेखापाल, नागपूर-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
महालेखापाल, मुंबई-१ (लेखा परिक्षा), मुंबई.
महालेखापाल, नागपूर-२ (लेखा परिक्षा), नागपूर
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/नागपुर.
संबंधित अधिकारी (मावजमार्फत).
सामान्य प्रशासन विभाग, का-१२, १६-ब व ३४
निवड नस्ती.